॥ श्री ॥

# श्रीमयूरकवि कृत.

## सप्तशती

## आर्या

ह्या

बाबाजी अनंत प्रभु, तेंडुलकर

यांनीं आपल्या.

"श्रीहरिवरदा" प्रिंटिंगप्रेस मध्यें छापिल्या.

मुंबई.

शके १८१५.

सन १८९३

# मोरोपंतकृतसप्तशती

## आर्या.



### प्रथमचरित.

श्रीमान् चैत्रकुलोद्भव सुरथ स्वारोचिषांतरीं होता ॥
तो सार्वभौम पोषी आत्मयशा हंसखग जसा पोतां ॥ १ ॥
औरसपुत्रासि जसा तात तसा तो प्रजांसि परिपाळी ॥
दैवें त्याची लागे कुदशेची त्या तशा हि परि पाळी ॥ २ ॥
रिपु कोलाविध्वंसी ते होउनि हीनबळ हि एकवट ॥
भंगिति पर-सैन्याऽर्णव वाटे तद्देश त्यांत एक वट ॥ ३ ॥
आक्रमिला त्या अरिनीं जेथें तो सुरथ वेढिलें पुर तें ॥
क्रूरत्व प्रकट असें केलें दैवें तया नृपीं पुरतें ॥ ४ ॥
दुर्बळ होतां फिरतां विधि हरिलें कोशबळ अमात्यांहीं ॥
पति कुदशा दुष्टांहीं जे तस्कर इच्छिज अमा त्यांहीं ॥ ५ ॥
स्वामित्व सेवकांहीं हरितां अश्वीं चढोनि एकाकी ॥
मृगयामिषें निघे कीं श्री हंसी स्पष्ट होय ते काकी ॥ ६ ॥

---

१ नामविशेष (राजा). २ स्वारोचिष-मन्वंतरीं. ३ बालकास. ४ वांटा. ५ नामविशेषशत्रु. ६ दैव. ७ अमावास्या. ८ कावळीण.

नृप आश्रमासि गेला जेथ वसे मूर्त योग मेधा त्या ॥
ज्ञान-तपःसामर्थ्यें करुनि स्वसमान जो गमे धात्या ॥
मेधा बहु सत्कारी गहनवनीं आश्रमीं वसे सांधी ॥
जरि तो सुरथ श्रीमुनि- चरण-श्रित-कल्पतरुतसे सांधी
त्या आश्रमीं फिरे तो चित्तीं चिंता करी ह्मणे हाय ॥
न कळे मत्पूर्वज-परि- पाळित-पुर-गति असे कसी काय ।
दुर्वृत्त भृत्य माझे पावावे स्वास्थ्य काय मन्नगरें ॥
झालें मज ही राज्य त्याज्य खलजनें जसें च अन्न गरें ॥
सगुण सदामद माझा हस्ती जो मुख्य संगर-सहाय ॥
कैसा असेल न कळे मज त्याचा ह्मणवि संगरस हाय ॥
मत्सचिव करित असतिल अनुवृत्ति मदीय शत्रु-भूपाची ॥
हाय कसी आवडली सेवा मानस-खगांसि कूपाची ॥ १२
कोशं क्षय पावेल चि जो अतिकष्टें जपोनि सांचविला ॥
भ्यां आपणासि समयीं कार्या येइल ह्मणोनि वांचविला ॥
नित्य बहु व्यय करितिल त्याचें ठावें असे जना शीलें ॥
सम्यक् व्ययस्वभाव न जो तो निधि नव हि कां न नाशील॥१
ममताकृष्ट-मति नृपति चिंता नानाविधा असी वाहे ॥
तों एका वैश्यातें भ्रमतां त्या आश्रमीं च तो पाहे ॥ १९

---

१ नामविशेष ( ऋषि ). २ ब्रह्मदेवास. ३ चिंताकार
४ मिळवी. ५ सेवक. ६ विषें. ७ सहवासप्रेम. ८ सेवा.
हंसासि १० भांडारगृह. ११ स्वभाव. १२ खर्च करणा
पुरुष.

त्यासि पुसे तो नृप तूं कोण दिसासि दुर्मना सशोक मला ॥
येथें कां आलासि स्व-जन-गृह-वियोग कार्य कां गमला ॥१६
वैश्य ह्मणे धनिक-कुळज मी वैश्य असें समाधि या नावें ॥
आलों वनासि दुःखें स्वमुखें काय स्वदैन्य सांगावें ॥ १७ ॥
सर्वस्व हरुनि मजला स्त्रीपुत्रांहीं वनासि पाठविलें ॥
केलें ज्यां परिपालन जें कांहीं तें तिहीं न आठविलें ॥१८॥
स्त्री-पुत्र-स्वजनांची कुशलाऽकुशल प्रवृत्ति[3] मी नेणें ॥
या आश्रमासि बापा अतिदुःखित[1] जाहलों असें तेणें ॥ १९॥
भूप ह्मणे केलें ज्या लुब्धांहीं त्यजुनि धर्म अत्याग ॥
त्यांच्या ही स्नेहाचा कां रुचला त्वन्मनासि अत्याग[4] ॥२०॥
काय करूं हृदय नव्हे निष्ठुर येतें ह्मणे समाधि रडें ॥
जरि लाजे त्वद्वाक्-शर- विद्धा या चाळनीसमा घिरडें[6]॥२१॥
मज गांजिलें निजांनीं अरिनीं भंगोनि गोविं माजावें ॥
न कळे प्रेम सुत-स्त्री- स्वजनातें त्यजुनि हें न कां जावें॥२२
ऐसें बहु वैश्य वदे त्या समदुःखा सह स्वयें राजा ॥
जाउनि मेध्यासि नमी प्रणतांच्या सिद्ध जो सदा काजा ॥ २३॥
भूप ह्मणे गुरुजी जें कांहीं पुसतों द्रवोनि सांगा तें ॥
गेलें राज्य तरि हि मन माझें माझें ह्मणोनि कां गातें ॥२४
युक्त[2] चि अज्ञानाचें विषयीं असतें सदैव हें बा जें ॥
जाणें मी दोष तरि हि गत-राज्य-पदीं ममत्व कां माजें ॥ २५॥

---

१ दुःखग्रस्त. २ करावयास योग्य. ३ वर्तमान. ४ अति-आग-महा अपराध. ५ न टाकणें. ६ पक्वान्नविशेष.

सुत-दारांनीं लुटिला तच्चिंताकुळ सदा परि समाधी ॥
हा वैश्य हि मी हि पहा दोघे आह्मी महीं वारे समाधींII२
ज्ञान्यास हि मोह असा कां आहे काय हें वदा स्वामी ॥
आह्मी दोघे आलों शरण पुरे अर्थ-काम या धामी ॥ २७
मेधा मुनि-राज ह्मणे देवी श्रीविष्णुची महा-माया ॥
बा या संसाराची स्थिति-कर्त्री तत्प्रभाव हा राया ॥ २८
ज्ञात्यांचें ही ओढुनि करि मोहाच्या अधीन हें मन गा ॥
उडविल चाळविल नृपा त्या हि चलन ज्या कधीं न हेमनगीं।
हे विश्व-हेतु देवी जगदंबा बंध-हेतु हे चि नृपा ॥
जीवांतें मुक्त करी जी विद्या काय ती इची च कृपा ॥ ३०
सुरथ ह्मणे मुनिनाथा जीतें ह्मणतोसि तूं महामाया ॥
झाली उत्पन्न कसी कर्म तिचें काय सांग हें बा यां ॥ ३१
मेधा ह्मणे कराया देवांची सर्व-कामना-पूर्ती ॥
प्रकटे तें चि उपजणें परि बा नित्या चि ती जगन्मूर्ती॥३
एकार्णव करुनि अखिल जग जगदीश्वर फणींद्र-तनुतल्पीं
भजला स्व योग-निद्र- प्रति पति सकळा हि शक्तिचा कल्पीं ३
प्रभु-कर्ण-मळा पासुनि मधु कैटभ असुर जन्मले दोघे ॥
ते खाया येती तैं भय भगवन्नाभिपद्मभव तो घे ॥ ३४ ॥
असुर स्ववधोद्यत निज-जनक प्रभु हि प्रसुप्त पाहोनी ॥
चतुरास्य योग-निद्रा- स्तुति करि नाभ्यंबुजीं च राहोनी ॥३५।

---

१ वैश्य. २ सम-आधि-समदुःखी. ३ मेरुपर्वतास. ४ मळ.
५ प्रळयकाळीं. ६ ब्रह्मदेव.

द्रुहिण ह्मणे परमेश्वरि तूं स्वाहा तूं स्वधा सुधा शांती ॥
श्रीसावित्री सृष्टि- स्थिति संहृति तुष्टि-पुष्टि-धी-क्षांती ॥ ३६ ॥
सृष्टिस्थितिलयकरही केले निद्रेसि वश तुवां व्यक्त ॥
सर्वेश्वरेश्वरि तुतें आहे कोण स्तवावया शक्त ॥ ३७ ॥
हरि हर विधि ऐशांही कोणाहि तुझी न वर्णवे लीला ॥
त्रिभुवन अवलंबुनि तुज जैसें फळ पुष्प पर्ण वेलीला ॥३८॥
भगवति करुनि दया त्वां मधु कैटभ असुर शीघ्र मोहावे ॥
ह्मणासि जसी तूं न ह्मणे सुरभी इष्टार्थ सर्व दोहावे ॥ ३९ ॥
मद्वधकाम असुरहे मधु कैटभ खळ करावया चूर्ण ॥
प्रभुला प्रबोध द्यावा त्वां जगदीश्वरि दयानिधे तूर्ण ॥ ४० ॥
ऐसी स्तविली भावें पद्मभवें हस्तपद्म जोडूनी ॥
देवी निधे प्रभूत्तम- नेत्रमुखादि- स्थळांसि सांडूनी ॥ ४१ ॥
प्रकटे या परि दर्शन दे ये कार्या परासु धात्यातें ॥
होऊं न दे चि झाली देवी आर्या परा सुधा त्यातें ॥ ४२ ॥
प्रकटुनि ह्मणे भगवती हूं विधिस सृजुनि असुर-भी जागे ॥
त्या वत्सा तो चिंता जों निजली माय न सुरभी जागे ॥४३
श्रुति गुरु ह्मणति जयातें न कळे जडजीव हो परि सजागा ॥
करुणार्णव दासहृदय- लोहाचा होय तो परिस जागा ॥४४॥
मत्त प्रभुतें देखति ते कां भिडतील मग न बाहूंनीं ॥
बाहूंनीं रण करिती भरिती क्रोधांध गगन बाहूंनीं ॥ ४५ ॥

---

१ मृत. २ ब्रह्मदेवातें. ३ बोलावून. ४ भुजांहीं ५ हुंकारांनीं.

उत्साह नव्हे चि उणा न ह्मणे कोणी हि हाय नंवदेहें
श्रीमुनि युद्ध प्रभुसां तें पंचसहस्र-हायन वदे हें ॥ ४६ ।
यत्पदरजासि लाजति चिंतामणि कामधेनु परमार्गें ॥
त्या मायें मोहित ते ह्मणती झालों च तुष्ट वर माग ॥ ६
भगवान् ह्मणे असुर हो देतां होउनि सुतुष्ट आजि वर ॥
व्हा वध्य काय अन्यें वरिला म्यां इष्ट हा चि आजिवर ॥
ते वंचित असुर ह्मणति जेथें उदकें परिप्लुता न मही ॥
तेथें आह्मांसि वधीं हो विजयी तूं चि समपराक्रमही ॥ ४
ऐसे असुर ठकाविले घालिति त्या ईश्वरेश्वरा कोडें ॥
इतरांसि समुद्र परी प्रभुला गोष्पद तसें चि तें थोडें ॥ ९
केले हरिनें अरिनें ते तोडुनि मस्तकासि असुं-रहित ॥
न सुरहि तद्गतिभाजन केलें वंचुनिहि फार असुरं-हित ॥ ५
ब्रह्म्यानें संस्तविली ती पूर्वीं प्रकटली असी देवी ।
परिस प्रभाव अणिकहि अमृतरसा तेविं रसिक या सेवी ॥५
यावरि महिषासुरवध मग शुंभ-निशुंभ-वधहि आयकवीं ॥
ती वर्षाश्री भेटे न करिल निश्चय करूनि काय कवी ॥ ५३
गत राज्य सुरथ पावे होय मनुहि तदभिधान सावर्णी ॥
जगदीश्वरी प्रभाव श्रीमार्कंडेय मुनि असा वर्णी ॥ ५४ ॥
होय समाधिहि युक्त श्रीजगदंबेसि भजुनि सुज्ञानें ॥
व्हावें कृतकृत्य श्री- हरिमायेतें हि त्यजुनि सुज्ञानें ॥ ५५

---

१ नूतनदेहें. २ मार्कंडेय. ३ पांचहजार वर्षें. ४ कल्पतरु
५ भिजलेली. ६ प्राणरहित. ७ दैत्यांचें हित. ८ ज्ञात्यानें.

प्रथम-चरित्र मयूरें लिहिलें हें किमपि सुरसिकां गाया ॥
अमृतप्राशनकामा सकरुण कावि ह्मणति सुरसि कां गा या ५६ ॥
माया तुझी मुकुंदा पावो तच्चरित वर्णिलें तुज तें ॥
सृजतें तुजमाजी स्थिति करितें तैसेंचि शेवटीं बुजतें ॥५७॥

प्रथमचरित समाप्त.

# मोरोपंतकृत सप्तशती आर्या.



## अध्याय १.

श्रीमद्विष्णुप्रभुची नमिली वरदा असी महामाया ॥
ब्रह्मांऽड-शतांत जिवा योग्य न महिमा असीम हा माया १
देवांचा शक्र अधिप असुरांचा महिष करिति हे कलहा ॥
शत-वर्षांऽतीं पावुनि परिभव शतमन्युवें ह्मगे बल हा ॥२॥
झाला इंद्र स्व-बळें समरीं पावोनि सैरिभ यशातें ॥
शक्र-प्रमुख-सुरांचीं विलया ने उग्र वैरि-भय शांतें ॥ ३ ॥
सुर कथिति दुःख विधितें तो यां सह जाय हरि-हरां-जवळ॥
यच्चरणांहीं केला शरणागतजनविपत्तिचा कवळ ॥ ४ ॥
ते कथिति इंद्र झाला महिष हरुनियां सुराऽधिकारा हो ॥
प्रभुजी असुरीं न श्री बहु-मोहकरी सुराऽधिका राहो ॥ ५ ॥
लोक-त्रय-पति झाला बहु मोठा महिष तो कपाळांचा ॥

१ मावण्यास. २ हाय. ३ महिशासुर. ४ सुखें. ५ यत चरण-ज्यांच्या पायांनीं. ६ देवाचा.

विधिचाहि करितसे अधि- कार न शक्रादि-लोकपाळाचा
आलों शरण तुह्मां कीं भवदितर न यश उपाय चिंतुनि
तुमच्याचि दयेनें नत- हृदयींचा क्षिप्र सर्व किंतु निघे।
सुरदीनोक्तश्रवणें हरि-हर-हृदयांत कोप ये राजा॥
प्रभु साहतिल कशा श्रित- जन-कुदशा सोसती न ये रा
प्रभुवर-हरि-हर-वदनें झालीं सुर-परिभवें भ्रुकुटि-कुटिलें॥
कीं महिप-तस्करें यश सर्वस्व हरुनि बळें स्व-बळ लुटिलें
प्रकुपित हरि-हर- शतधृति जे या सुरनायकाननांतुन॥
सुमहा तेज निघालें दहनाचें काय काननांतून ॥ १० ॥
शक्रादिसुरांच्याही देहांतुनि दिव्य तेज बाहेर॥
तैसें चि निघे जें शुचि- कीर्तीचें भाग्यवंत माहेर ॥ ११ ॥
तें एकवटे त्याचीं होय हराया सुराऽरि-मद नारी॥
तीतें पाहुनि जयजय वदले विधि-विष्णु-वृत्र-मदनाऽरी॥१
तीचें मुख हर-तेजें यम-तेजें केश मस्तकीं झाले॥
हरि-तेजें भुज ज्यांच्या सज्जन सेवुनि यशोमृता धाले॥१३

---

१ भवत्-इतर-तुमच्याहून इतर. २ नम्र झालेल्यांच्य हृदयांतील. ३ दुःख-कांक्षा. ४ सुर-दीन-उक्त-श्रवण-देवांच्य दीन भाषणाच्या ऐकण्यानें. ५ क्रोधानें वांकड्या भोंवया ज्यांच्या ठायीं अशी. ६ विष्णु, महादेव आणि ब्रह्मदेव. ७ सुर-नायक आनन-देवांच्या नायकांच्या मुखांतून. ८ वृत्रासुर आणि मदन यांचे शत्रु इंद्रमहादेव. ९ यश-अमृत-कीर्तिरूप अमृताला.

स्तन-युग्म सोम-तेजें मध्य हि ऐंद्रेंकरूनियां होय ॥
तत्तेजें जंघोरू ज्यांच्या स्वाधीन सर्व ही तोय ॥ १४ ॥
गुरु-तर नितंब भौमें ब्रह्म्याच्या दिव्य चरण तेजानें ॥
तें सौरें शोभति करुनि रक्तांऽगुलि-दशक चरण ते ज्यानें ॥१५
हस्तांऽगुलि वसु-तेजें जी सम अवयव न आन नासा जे ॥
झाली कुबेर-तेजें ते बहु शोभवुनि आननां साजे ॥ १६ ॥
प्राजापत्यें झाले रुचिनें लाजविति अमृत-रस दंत ॥
पावक-तेजें नयन- त्रय होय करावयासि असदंत ॥ १७ ॥
भ्रूयुग संध्या तेजें मारुत-तेजेंकरूनि कर्ण न हो ॥
जे ह्मणति श्रित-दुःख- श्रवण सदा तत्सुकीर्तिवर्णन हो ॥१८
या परि पावे तेजें अन्यसुरांच्या हि संभवा राया ॥
जीचें क्षेम यश पंकीं गंगेचें जेंवि अंभ वाराया ॥ १९ ॥
जें धरित्याच्या अरिला न स्वप्नामाजिही शिवें शिवे तें ॥
निज-शूल-प्रभव विजय-मूल अतुल शूल दे शिवें शिवेतें ॥२०॥

---

१. इंद्राच्या तेजें करून. २ जंघा-उरु-जांघा आणि मांड्या. ३ ज्या वरुणाच्या. ४ अतिशय मोठा. ५ कमरेच्या पाठी मागचा भाग (ज्याला माज असें ह्मणतात तो). ६ पृथ्वीच्या तेजानें. ७ सूर्याचें. ८ अन्य. ९ नासिका. १० मुखास. ११ ब्रह्मदेवाच्या तेजानें. १२ कांतीनें १३ असत्-अंत-दुष्टांचा नाश. १४ तत्-सुकीर्ति-वर्णन-त्यांच्या उत्तम कीर्तीचें वर्णन. १५ समर्थ. १६ पातका आणि मलास. १७ जल. १८ धारण करणाऱ्याच्या. १९ कल्याण. २० स्पर्श करी. २१ महादेव. २२ भवानीला.

प्राण-व्यसनीं जेणें गज-वर रक्षूनि निवटिला नक्र ॥
त्या निज-चक्रा पासुनि निर्मुनियां चक्रपाणि दे चक्र ॥२१
त्या भगवतीस भावें गो-क्षीर-धवल जलेश[१] दरवर[२] दे ॥
प्रार्थुनि ह्मणे अरीचा बाधों द्यावा न लेश दर[३] वरदे ॥२२
दहन हि दे शक्ति तिला जी तेजें करुनि लाज दे वीजे ॥
देविन ह्मणे तुझे ते वांच्छीत पदार्थ आज देवी जे ॥ २३
दे दिव्य चाप मारुत शर-पूर्ण तसे च देव तो भाते ॥
स्वीकारितां शिवेनें बहु धाले पावले चि शोभा ते ॥ २४ ॥
प्रतिपक्षें[४] करिघटेला[५] ज्याचा दूरूनि भावि त्रास वदे ॥
त्या स्वगजाची घंटा निजवज्रोत्पन्न[६] वज्र वासव दे ॥ २५
यमधर्म काळदंडा- पासुनि दे दंड वरुण पाशातें ॥
जे आपणासि दुर्जय दुर्जन त्या-सर्व-शत्रुनाशातें ॥ २६ ॥
माळा प्रजापती ही दे त्या जगदंबिकेसि अक्षांची[७] ॥
ब्रह्माऽर्पित सु-कमंडलु घे राज्ञी दुष्ट-दमन-दक्षांची ॥ २७
निजकिरणांतें स्थापी भानु तिच्या सर्व-रोम-कूपांत ॥
दे खड्ग चर्म काळ क्षय व्हाया देव-शत्रु-भूपांत ॥ २८ ॥
क्षीरोदधि दे अजेरें[८] वस्त्रें तैसा चि अमलें[९] हार तिला ॥
ह्मणवी रुचिनें जिंकुनि बहु जीचें वदन-कमल हा रतिला

१ वरुण. २ शंखश्रेष्ठ ३ भय. ४ बर्ची. ५ शत्रु. ६ गजसमूहास. ७ निज-वज्र उत्पन्न-आपल्या वज्रा पासून उत्पन्न ८ रुद्राक्षांची. ९ जीर्ण नव्हेत असीं ( नवीं ). १० मळरहित ( शुद्ध ).

जो देव विश्वकर्मा त्या चतुरें दिव्य-वस्तुच्या घटकें ॥
दिधलीं चूडामणिसह सु-मणि-कनक-खचित-कुंडलें कटकें ॥ ३०
धवलार्ध चंद्र कंठा- भरण चरण-बाहु भूषणें दे हा ॥
मणिमुद्रिका हि आनख- शिख भावें करुनि भूषवी देहा ॥३१॥
विमल परशु विविधाऽस्त्रें तैसें चि कवच अभेद्य देवीतें ॥
जीचें कृपा-निरीक्षिण अत्यद्भुत-सर्व-संपदे वीतें ॥ ३२ ॥
अम्लान-पद्म-माळा दे सिंधु उरीं शिरीं धरायास ॥
तो आपणासि दुस्तर- जाड्यांभोधींत उद्धरायास ॥ ३३ ॥
रत्नें देउनि दिधला मृगराज बसावया हिम-नगानें ॥
जाया जाड्य यशार्च्या चरणीं च वसावया हि मन गानें॥३४
दे पानपात्र धनपति वीर्योत्साहें वधावया अरितें ॥
न रितें व्हावें तिळ हि प्राशन केलें क्षणक्षणीं तरि तें ॥३५॥
अर्पी परमप्रेमें पूजुनि सविशेष नागहार तितें ॥
भूभाराऽसुर-शमनें मागे कवि शेषनाग हा रतितें ॥ ३६ ॥
अन्य-त्रिदशांनीं ही सर्व-स्व-विभूषणायुधांनीं ती ॥
सन्मानिली बहुमता जैसी प्राणाऽधिका बुधां नीती ॥ ३७ ॥
मग साऽट्टहास वारं- वार शिवा गर्जना करी राजा ॥

---

१ कंठ-आभरण-चंद्रहार. २ विश्वकर्मा. ३ नखां पासून केशां पर्यंत. ४ प्रसवतें. ५ तरण्यास कठीण अशा जडत्वरूप समुद्रांत. ६ सिंह. ७ हिमाचलानें. ८ कीर्तीच्या. ९ कुबेर. १० पानपात्र. ११ सुखातें किंवा प्रीतीतें.

म्यां किति वर्णाव्या त्या बहु कांपविती विराट्-शरीरा ज्या ॥
त्या सिंहवाहिनीतें जय ऐसें सर्व देवता ह्मणती ॥
स्तविती मुनि-वर करिती बहु भक्ति-विनम्र होउनि प्रणती ॥
ऐकोनि आः[1] किमेतत्[2] कुपित खळ ह्मणे स-सैन्य तो धांवे ॥
आले सर्व न लगती दीप-द्युतिला पतंग शोधावे ॥ ४० ॥
महिषाऽसुरें भगवती धांउनि येऊनि देखिली होती ॥
सुर-विभव-चित्रकारें[3] जी गगन-पटांत रेखिली[4] होती ॥ ४१ ॥
जीनें श्री-चरणांहीं करितां आक्रमण भूमिका लवली ॥
गगनीं जिच्या किरीटें सग्रह-नक्षत्रराजि[5] कालवली ॥ ४२ ॥
जीच्या बाहु-सहस्रें व्यापुनि दिक्-चक्र[6] सर्व शोभविलें ॥
क्षोभविलें चाप-रवें कांऽई यशें देव-वृंद[7] लोभविलें ॥ ४३ ॥
मग त्या श्री-दुर्गेशीं असुरभटांशीं प्रवर्तलें युद्ध ॥
होय दिगंतर शस्त्रा-ऽस्त्र-विदीपित[8] ज्यांत तें असें युद्ध[9] ॥ ४४
महिषासुर-सेनानी[10] चिक्षुर-नामा महाऽसुर तसा च ॥
चामर चतुरंग-बळें-युक्त रण-मखीं महासुर[11] तसा च ॥ ४५ ॥
तैसा च ईश्वरीशीं षडयुतरथयुत[12] उदग्र युद्ध करी ॥

---

१ क्रोधार्थी अव्यय. २ किं एतत् काय हें असें. ३ देवांचें ऐश्वर्य हा च चितारी त्यानें. ४ लिहिली. ५ ग्रह आणि नक्षत्रें यांची पंक्ति. ६ ब्रह्मांड. ७ देवसमूह. ८ शस्त्रें आणि अस्त्रें यांहीं प्रदीप्त-पेटलेलें, (देदीप्यमान). ९ युद्ध. १० महिषासुराचा सेनापति. ११ दैत्य. १२ षट्-अयुत-रथ-युत-सहा अयुतें जे रथ त्यांहीं करून युक्त असा.

परि तो आला व्हाया दैवी-शर-निकर-सिंह-रुद्ध करी ॥ ४६॥
असुर महाहनु हि करी समर रथाऽयुत सहस्र आणून ॥
असिलोमा रथ पंचा- शत्रियुत-युत स्व-विजय जाणून ॥ ४७
बाष्कळें हि निज-जयाची श्रवण करित बंदि-गण-मुखें गाणीं॥
रथ एक कोटि षट्शत अयुतें गज हय असे चि बहु आणी ४८
पंचाशत्-कोटि-मित- स्यंदन-परिवृत सुराऽरि मत्त महा ॥
वीर बिडालाख्य करी दुर्गेशीं युद्ध असुर सत्यमहा ॥ ४९ ॥
रथ-गज-हय-परिवृत सुर- रिपु अन्य हि अयुतसंख्य जे क्रूर॥
ते चंड-मुंड-शोणित- बीजादिक करिति रण महाशूर ॥ ५० ॥
तुरग परार्ध परार्ध स्यंदन गज ही परार्ध या परि तें ॥
निजबळ आणी समरीं पाडाया तो लुलाय पाप रितें ॥ ५१ ॥
करिते झाले सोडुनि शस्त्राऽस्त्रें स्वैर असुर समरा या ॥
त्यजुनि भजन-सुरस कुमति ते प्याले वैर-असुरस मराया॥ ५२॥
तोमर मुद्गर मुसळ प्रास परशु पट्टिशाऽसि शर शक्ति ॥
पर-शस्त्रें निज-शस्त्रें खंडी लीलें करूनि पर-शक्ति ॥ ५३ ॥
तम रवि-रुचितें किंवा सद्विवेतें महाऽघन शिवे तें ॥
तैसें त्या असुराचें शस्त्र-पटल जितमहाघन शिवेतें ॥ ५४ ॥
तो हि शिवा-वाहन हरि बहु कोपे कंपवुनि सटा याला ॥

---

१ देवीचा शर-समूह हा च सिंह त्यानें रुद्ध व्हाया. २ हत्ती. ३ दैत्य. ४ सत्य ते जीचें असी (दुर्गेचें विशेषण.). ५ महिषासुर ६ कुबुद्धि. ७ वैररूपविषरस. ८ जिंकिले मोठे मेघ ज्याणें असें. ९ देवीतें. १० सिंह. ११ मानेवरचे केंश.

साहे न दवा वनसें सैन्य कसें संपवु निसटायाला ॥ ५५ ॥
जे सोडिले शिवेनें संगर करितां सुगंध निश्वास ॥
ते चि असितगण झाले रक्षाया असुर वधुनि विश्वास ॥ ५६॥
करितील पर्[1]-नग-शिरःशिखरीं ते अशनि कां गण न टांचा
वाढवि हर्ष तयांचा तें प्रभुचें[2] जेविं आंगण नटांचा ॥ ५७ ॥
किति एक युद्ध करिती ते गण वाद्यें किती क वाजविती ॥
गाजविति ब्रह्मांडढ ध्वांत-हराच्या[3] करांसि[4] लाजविती ॥ ५८
परमेश्वरी विदारी जो त्यजि ना याेध आयुधा त्यातें ॥
तें काय ती पुढें जी देणारी बोध आयु घात्यातें ॥ ५९ ॥
खड्गें करूनि तोडी अरिस फळसमान वा घसाघस ती ॥
ज्या त्यास ह्मणे चित्तीं जा लोक सुखें अबाध साध संती ६०
शूलें चक्रें वज्रें करि पर-मारण महा-गदा-घातें ॥
विश्वाच्या वाराया वरि परमा रण महा गदाघातें ॥ ६१ ॥
असुर वधुनि रण-रंगीं शोणित-तटिनी उदंड वाहविल्या ॥
त्यांतें खळचमू त्यांत हि न च कांहीं पाप-मति हि राहविल्या
लावी सतत शराचीं द्यायास पैरा शैरासना दानें ॥
खळ किति निज घंटेच्या मोहिति च पराशरास नादानें ॥
उगवी महा-भय-तिमिर- सागर-पर-पारदा दिना कैर्षी ॥ ६३॥

१ शत्रुरूप पर्वतांच्या मस्तकरूप शिखरीं. २ राजाचें. ३ सूर्याच्या. ४ किरणांस. ५ ब्रह्मचार्ने. ६ देवी. ७ शत्रुक्षय. ८ महा-गद-अघ-महारोगरूपपातकातें. ९ रक्तनद्यांत. १० खळचमूं-तही. ११ शत्रूला. १२ धनुष्यास. १३ उत्पन्न करी. १४ महाभ-यरूप अंधकारसमुद्राच्या पैल तीरास पोंचविणाऱ्या. १५ ओढी.

पाशें बांधोनि असुर बहु सुखवी नारदादि नाकर्षी ॥ १४ ॥
पाडी दासळुनि विशिख- वर्षे ती घनघटा कितेकांतें ॥
सल्लंघन घातक जरि नसतें तरि अनघ टाकिते कां तें ॥१५॥
पाहति रणीं कराया त्या देवीशीं बराबरि कबंध ॥
नाचति हर्षे जाणों ह्मणती तुटला बरा बरिकें बंध ॥ १६ ॥
बाळभय हरुनि ऐशी कोणी हीं हर्षली प्रसू नाहीं ॥
त्या श्रीजगदंबे वरि सुरसंहति वर्षली प्रसूनांहीं ॥ १७ ॥
क्षणमात्रें सर्व-महिष- सैन्य शिवा-गणसमूह हरि खरची ॥
घन जेविं मयूर-मनीं देव-मनीं तो प्रताप हरिख रची ॥१८॥

---

# अध्याय २.

देवी वरि बळ-नाशें धांवे कोपोनि ह्मणत चिक्षुर हा ॥
जाणो करेणुंसि ह्मणे भंगावा काम धरुनि इंक्षु रहा ॥ १ ॥
मेरु शिरीं तोयदसा देवी वरि तो महेषु-वृष्टि करी ॥
सिंहीतें माराया वाटे झटतो मदांऽध-दृष्टि करी ॥ २ ॥
देवी ते शर तोडुनि सोडुनि निज-शत्रु-काय-हानि-कर ॥
लीलेनें चि अरिसि करि विरथ ह्मणति देव काय हा निकर ॥३
हय-सारथि-चाप-ध्वज- नाशें अत्यंत पाप तो खवळे ॥

---

१ बाणवृष्टीनें. २ मेघसमूह. ३ सत्-लंघन-साधूचें लंघन. ४ हा कोंकणी शब्द आहे. याचा गर्भितार्थ 'मात्र' असा निघतो. ५ माता. ६ देवसमुदाय. ७ फुलांनीं. ८ हर्ष. ९ नामविशेष ( दैत्य ). १० हत्तिणीस. ११ ऊस. १२ मेघसा. १३ गज. १४ आपल्या शत्रूंच्या शरीराचा नाश करणारे.

अपराधंकरीं जैसा घाया आंशीस साप तोख वळे ॥ ४ ॥
तीव्रत्वें क्षुरं चिक्षुर तो घेउनि खड्ग-चर्म नव धावे ॥
देवी ह्मणे असे म्यां न विलोकुनि शूरकर्म न वधावे ॥ ५ ॥
आधीं करी हरि-शिरीं तो समरीं चिक्षुर प्रहारातें ॥
जरि ही त्याला होता या समरीं चिक्षुरप्र-हारातें ॥ ६ ॥
मग जो वर तेजाचा लावण्याचा हि भव्य-भुज गाभा ॥
खड्गें करूनि हाणी चिक्षुर त्या परमभव्यभुजगाभा ॥ ७ ॥
देवी-बाहु-स्पर्शें गेला तत्काळ उडुनि करवाल ॥
तरुण रवि ज्यांत लोपे त्या तेजीं काय उडु-निकर वाल ॥८॥
सोसे न तिची त्या जसि काशीची नीचमद्रका लीला ॥
क्षेपी शूल क्षोभें लक्षुनि तो क्षुद्र भद्रकालीला ॥ ९ ॥
अहि वरि गरुड तसा ती त्या वरि निज-शूल अंबिका धाडी॥
ताडी त्या शूळातें भस्म करुनि चिक्षुरासि ही पाडी॥ १० ॥
महिषं-चमूपति मरतां त्रिदशार्दन मत्तसिंधुरारूढ ॥
चामर-पामर टाकी शक्ति महाशक्ति वरि महामूढ ॥ ११ ॥
शक्ति पडे कीं तीचा मद हुंकारें चि चंडिका उतरी ॥
वाटे मूर्च्छित पडली ती सिंहीनें दटाविली कुतरी ॥ १२ ॥

---

१ अपराधकर्त्यांचे ठायीं. २ दाढेला. ३ वस्त्र. ४ सिंह-मस्तकीं. ५ बाणरूप हारातें. ६ परम-भव्य-भुजग-आभ-महाभुजगसदृश (भुजांचें विशेषण). ७ खड्ग. ८ कःपदार्थ. ९ नक्षत्रसमूह. १० केशासदृश. ११ अपवित्र मद्रदेशाला. १२ नीच, हलका. १३ महिषासुराचा सेनापति. १४ त्रिदश-अर्दन-देवांला पीडा देणारा. १५ मत्त-सिंधुर-आरूढ-मदोन्मत्त हत्ती वर बैसलेला

खंडी शूल हि दुर्गा ज्यासि सुगारी अंराति चामर तो
न वधीं स्वयें तयां कीं सांपडतो मृगवैरा तिच्या मरतो॥१३॥
तों तो चढला अरिच्या हास्ति-शिरीं सिंह उडुनि वेगानें ॥
ज्या उदयनगाग्रगशशि- सदृशाच्या सर्व उडु निवे गानें ॥ १४
असुरांची काळ-मुखीं द्याया भय परं-मनीं चमू ढकली ॥
जो हरि करी तयाशीं तो चामर परम नीच मूढ कली॥१५॥
मेळविती सुभट यशें करुनि तनु-त्याग ज्या वरुनि महितें ॥
भुजयुद्ध करित दोघे ते आले त्या गजा वरुनि महितें॥१६॥
हरि शिरला द्रुत कंदुक महि वरुनि उडुनि जसा नभीं शिरतो
पुनरपि पडोनि उडवी तत्काळ चि त्या सुराऽरिचें शिर तो॥
वधिला वृक्षशिळांहीं दुर्गेनें तो उदग्र समरांत ॥
जेणें तेज मिरविलें होतें हो तें असह्य अमरांत ॥ १८ ॥
मथिला करांळ हि रणीं व्यापोनि स्वदंत-मुष्टितळें ॥
केलें सुयश करावें जीवां द्यायासि जेविं तुष्टि तळें ॥ १९ ॥
कोपोनि उद्धतातें चूर्ण करी ईश्वरी गदा-पातें ॥
तें कुतुक देखत्यांचें बा एक हि न लवलें तदा पातें ॥२०॥
तैसें चि भिंडिपाळें रण-रंगीं बाष्कळांसि ती निवटी ॥

---

१शत्रु. २ सिंहास. ३ उदय-नग-अग्र-ग-शशि-सदृश-उदयपर्वतवर्तिचंद्रतुल्याच्या. ४ सर्वलोक रूप नक्षत्रें. ५ शत्रूंच्या मनांत. ६ सिंह. ७ पूज्यें (यशांचें विशेषण). ८ पृथ्वीतें. ९ चेंडु. १० नामविशेष दैत्य. ११धरूनि. १२ आपले दंत आणि मुष्टितळ (चवराक) याणें. १३ सरोवर.

जीची स्मृति न उरों दे दुःस्वासि पुढें तमा जसी रविटी २१
चूर्ण करी बाणांहीं ताम्रासि तसें च अंधकोलाही ॥
पक्षीश्वरदृष्टिपुढें केवळ होतो चि अंध कालाऽही ॥ २२ ॥
उग्रास्य उग्रवीर्य त्रिदशांचा रिपु महाहनु हि तिसरा ॥
हे मारुनि त्रिशूलें त्यांसि ह्मणे पूर्व-कुमतिला विसरा ॥ २३॥
त्या हि बिडालाक्षाचें केलें खड्गें शिरोऽब्ज-कर्तन हो ॥
कीं हर्षें विधि-हरि-हर- लोक-पति-सभांत गान नर्तन हो २४॥
दुर्धर दुर्मुख हि रणीं बाणांहीं यमगृहासि पाठविले ॥
ज्यांचे अपकार सदा देवांहीं हाय ह्मणुनि आठविले ॥ २५ ॥
बळ-नाशें महिषासुर खवळे पापाग मोह त्याला जो ॥
तो कां न ह्मणेल निपट बाळ यमाच्या गमो हल्या लाजो ॥
तो कोप आंत बाहिर ह्मणवाया त्रिभुवना अहंह त्याला ॥
गण-बळ मर्दी तेव्हां प्रळयींचे लाजले अंह हल्याला ॥ २७ ॥
किति गण तुंडाघातें वधिले महिषाऽसुरें रणीं रागें ॥
कितिक खुर-क्षेपांहीं पद्म जसें मर्दिजे महानागें ॥ २८ ॥
पुच्छें किति लोळविले किति शृंगांहीं विदारिले क्रूरें ॥
निश्वास-वेग-नाद- भ्रमणांहीं कितिक नाशिले शूरें ॥ २९ ॥
झालें प्रथम बळ-पतन सर्व सविस्तर न बोलवे गा तें ॥
धांवे हरिशि वधाया पवनाच्या करुनि फोल वेगातें ॥ ३० ॥

---

१ पक्षि-ईश्वर-दृष्टि-गरुडाच्या दृष्टी पुढें. २ कृष्णसर्प. ३ शिरःकमलाचें खंडन. ४ अन्याय. ५ पापपर्वत. ६ खेदार्थी अव्यय. ७ दिवस. ८ महिषाला. ९ दैत्यविशेष.

येतां निजसिंहा वरि पाहे कोपोनि अंबिका याला ॥
झालें चि म्हणे याच्या मित्र जल तृणाऽग्र-लंबि कायाला २१
तें महिष करी चेष्टित करितो सोडूनि सोय रेडा जें ॥
सुर-म्हणति शेवटींचें सुखदाया गृध्र सोयरे डोजें ॥ २२ ॥
शृंगांहीं गिरि उडवी वेग-भ्रमणें चि भूमिला फाडी ॥
उसळोनि जलधिं बुडवी तो पुच्छें त्यासि जेधवां ताडी २३
त्याच्या शृंगाघातें बहु झाले खंड खंड घन झडले ॥
श्वासें उडोनि गगनीं गेले तृणसे पुन्हा अचळ पडले ॥ २४ ॥
या परि बळ-मायांच्या फुगला होता मनीं लुळाय शतें ॥
किति वर्णावें कथितों जगदंबेचें नृपा तुला यश तें ॥ २५ ॥
कोप करी आंगा वरि येतां पाहोनि चंडिका यातें ॥
कांपवि बांधुनि पाशें मवळा ही जेविं थंडि कायातें ॥ २६ ॥
तत्काळ बद्ध होतां असुरांचा भूप रूप तें सोडी ॥
हरि होय तों चि खड्गें त्या शत्रुशिरास ती सती तोडी २७
तों खड्ग-चर्म-धर तो होय पुरुष परम दक्ष मायावी ॥
त्यासि शरांहीं मारी न च हरितां पर-मद क्षमा यावी ॥२८॥
मग होय महागज तो गर्जे ओढी हरीस धरुनि करें ॥
कर तोडिला कृपाणें जैसा रंभाऽभिधानें-तरु निकरें ॥ २९ ॥
पुनरपि हिता गमे त्या दुर्मतिच्या चाकरासि कासरता ॥

---

१ तृणाच्या अग्रभागीं रहाणारें. २ भक्ष्यें. ३ शृंग-आघात-शिंगाच्या ताडनानें. ४ पर्वत. ५ महिशासुर. ६ खड्गानें. ७ रंभा-नामक वृक्ष ( केळीचा खांब ). ८ महिषरूपत्व.

दुसरा मार्गे येतां अमरत्वाचा करा सिका सरता ॥४० ॥
त्रैलोक्य तसें चि पुन्हा तो महिष क्षोभवून भींनाच ॥
बहुधा म्हणे शिवा सुर- मुनिस कलह लोभवू नमीं नाच॥४१
कोपोनि जगन्माता पान करी अरुणं-लोचना मग ती ॥
हांसे पुनः पुन्हा पर- भंर वारुनि हर्षवावया जगती ॥ ४२ ॥
बळवीर्यमदोद्धत तो असुर हि गर्जोनि शैल शृंगांनीं
उडवी तिज वरि वरिलें जीचें पद-पद्म साधु-भृंगांनीं ॥ ४३ ॥
परमेश्वरी हि सोडुनि खरतर-शर-निकर बहु तिहीं तूर्ण ॥
द्वेषि-प्रेषित-पर्वत सर्व तदुत्साहसह करी चूर्ण ॥ ४४ ॥
कवि-सुर-गंधर्व जिच्या पद-भक्तिं-प्राप्त-पद-नरा गाती ॥
अस्पष्टाऽक्षर बोले पानमदोद्धूत-वदन-रागा ती ॥ ४५ ॥
पीतें मधु तों मूढा गर्ज क्षण भरि धरूनियां गर्वा ॥
म्यां तुज वधितां येथें गर्जतिल क्षिप्र देवता सर्वा ॥ ४६ ॥
वदोनि असें उडुनि चढे पृष्ठावरि जारि हि तो महिष झाडी ॥
पादें आक्रमण करुनि कंठीं शूलें करूनि ती ताडी ॥ ४७ ॥
झाली त्रिभुवन-सुखदा ते आति अद्भुत करूनि कर्म असी ॥
तों निज-वदना पासुनि असुर निघाला धरूनि चर्म असी ॥ ४८

---

१ भीत नाहींच. २ आरक्त नेत्र जीचे असी. ३ शत्रूंचा मार. बळ-वीर्य-मद-उद्धत-बळ, शौर्य आणि गर्व यांहीं माजलेला. ४ चरणभक्तिरूप मिळालें स्थान ज्यास अशा मनुष्याला. ५ पान-मद-उद्धूत-वदन-राग-मद्यप्राशनाच्या कैफानें चंचल आहे मुखाची लाली जीच्या अशी. ६ ढाल- तलवार.

अर्ध-विनिर्गत होतां केला तो आद्य शक्तिनें रुद्ध ॥
शुद्धयशोर्थं तसा ही श्रीदुर्गेशीं करी महायुद्ध ॥ ४९ ॥
तेव्हां दिव्य-कृपाणें मस्तक-खंडन करूनि असु-रहित
तो महिष पाडिला श्री-देवीनें जो सदैव असुर-हित ॥ ५० ॥
ज्या धाया सु-कवि-मनीं निर्दयपत्यंतकोपमा यावी ॥
वधिला देवीनें या परि तो अत्यंत कोप मायावी ॥ ५१ ॥
माहिष-वधें खळबळलें वातें बहु जेविं तोय खळबळतें ॥
हा हा ह्मणुनि पलायन-पर चि निहत-शेष होय खळ-बळतें ५२
सुरगण सकळ सबळ-खळ- माहिष-वधें जाहले परम हर्षी ॥
स्तविती जगदंबेतें नारद-सनकादि जे पर महर्षी ॥ ५३ ॥
जे नटाति अप्सरोगण ते मोर चि गान तो अनघ न टाहो ॥
निववी यशोमृतातें वर्षुनि जी ती शिवा घन-घटा हो ॥ ५४ ॥

द्वितियचरित्रसमाप्त.



## अध्याय १.

श्री-विद्या बळ-मत्त प्रभु शुंभनिशुंभ जाहले होते ॥
शक्रादि-लोकपाळां-करवीं च पदासि लाहले हो ते ॥ १ ॥
काळातें हि न भीती जे ते भीतील दैत्य कां पविते ॥
तद्बळ सुरांसि कांपवि जेविं दरिद्रासि शैत्य कांपवितें ॥ २ ॥

---

१ उत्तम खड्गानें. २ प्राणरहित. ३ दैत्यांचा हितकर्ता. ४ निर्दय-पति-अंतक-उपमा-निर्दयांचा पति जो अंतक त्याची उपमा. ५ मेघसमूह. ६ पावले. ७ वज्रातें. ९ अर्धा बाहेर निघालेला.

तीतें शक्रादि-सुर स्तविती जाउनि तदा हिम-नेगातें ॥
जीच्या वात्सल्यातें सर्व सु-कविंचें सदा हि मन गातें ॥ ३ ॥
सुर-जन करीत होता केवळ दीनां जनां सम स्तवन ॥
तद्रचितस्तवनादें नादमय चि होय तें समस्त वन ॥ ४ ॥
तों त्या स्थानीं गौरी ये गंगा-तोय-मज्जन कराया ॥
जी त्या हिमालयातें ह्मणते हो होय मज्जनक राया ॥ ५ ॥
जी ह्मणते निज दासा- हुनि सुरभीचा न वत्स मार्से र हो ॥
ती त्यांसि पुसे करिती कोणाचा स्तव भवेत्सभा सुर हो॥६॥
तों तच्छरीरकोशा पासुनि सहसा निघे शिवा मग ती ॥
स्तवुनि मज ह्मणे केलें शुंभ निशुंभादिशत्रुनीं अगती ॥ ७ ॥
झाली शरीरकोशा- पासुनि या स्तव चि कौशिकी नामें ॥
तद्दर्शनीं च आलीं जीं नव्हतीं तीं सुर-व्रजीं धामें ॥ ८ ॥
निघतां चि शिवा झाली कृष्णा जी तप्त-कांचन-च्छवि ती ॥
गौरीस कालिका हें ठेवुनि अभिधान या स्तवें स्तविती ॥ ९ ॥
होती हिमाऽचलीं श्री- जगदंबा परमसुंदरी तीतें ॥
खळ चंड मुंड देखति जे वश सुंदोपसुंदरीतीतें ॥ १० ॥
ते दुष्ट भृत्य तेथुनि जाऊनि कु-शील-मद्य-कुंभातें ॥

---

१ हिमाचलातें. २ तत्-रचित-स्तव-नाद-त्या देवांनीं केलेल्या स्तुतीच्या नादानें. ३ मत्-जनक माझा बाप. ४ तेजस्वी. ५ भवत्-सभा-तुमची सभा. ६ तत्-शरीर-कोश-तिच्या अंगा पासून. ७ गतिहीन ८ देव-समूहीं. ९ तेजें. १० तापलेल्या सुवर्णा सारिखी कांति जिची अशी. ११ दुष्टस्वभावरूप मद्याच्या कुंभातें (कलशातें).

स्व-स्वामीतें भेटुनि ऐसें प्रार्थूनि वदति शुंभातें ॥ ११ ॥
सुमनोहराकृति महा- राजा आह्मीं विलोकिली महिला ॥
शोभविती निरुपम-निज- देह-द्युतिनें हिमाऽद्रिच्या महिला ॥१२
उत्तम रूप तसें तों कोणीं कोठें न देखिलें होतें ॥
जाणों न करें विधिनें चतुरें चित्तें चि रेखिलें होतें ॥ १३ ॥
ती कोण स्त्री प्रभुनें शीघ्र निपुण शोध करुनि जाणावी ॥
देखावी स्वामीनें ध्यावी निज-मंदिरासि आणावी ॥ १४ ॥
देवा देह द्युतिनें ती युवति दिशा दहा हि शोभविते ॥
जसि चंद्रिका चकोरा तसि जो प्रेक्षक तयासि लोभविते ॥१५॥
रत्नें मणि गज वाजी जे जे उत्तम पदार्थ लोकांत ॥
ते ते सर्व हि सांप्रत शोभति शुंभा तुझ्या चि ओकांत ॥१६॥
ऐरावत गज-रत्न द्रुम-रत्न हि पारिजात हय रत्न ॥
उच्चैःश्रवा हि शक्रा पासुनि त्वां आणिला करुनि यत्न ॥१७॥
जें अत्यद्भुत दिव्य ब्रह्मयाचें हंस-युक्त अजि राया ॥
तुझिया विमानरत्न हि सेवितसे सर्वकाळ अजिरा या ॥ १८॥
निधि-मुख्य महापद्म हि धनदा पासूनि आणिला आहे ॥
तुजला दिली समुद्रें माला अम्लान-पंकजा बा हे ॥ १९ ॥
वारुण कनक-स्त्रावी छत्र तुझ्या मंदिरीं असे स्वामी ॥
पूर्वी प्रजापतीचा जो रथ-वर तोहि या असे धामीं ॥ २० ॥
त्वां मृत्यु-शक्ति हारिली जीचें उत्क्रांतिदा असे नाम ॥

---

१ स्त्री. २ भूमीला. ३ मंदिरांत. ४ अंगणास. ५ वरुणाचें मरण देणारी.

कोणा अर्था विषयीं सफळ न झाला प्रभो तुझा काम ॥२१॥
पाश सलिल-राजाचा तव अनुजाच्या परिग्रहीं धन्या ॥
ज्या ज्या समुद्र-जाता त्या त्या सद्रत्न-जाति ही अन्या ॥ २२॥
तैशीं च अग्नि-शौचें दहनें ही तुज दिलीं प्रभो वस्त्रें ॥
या परि सकळें रत्नें त्वां प्रभुनें स्पष्ट जोडिलीं शस्त्रें ॥ २३ ॥
मग रत्नभुग्वरें त्वां ऐसें स्त्रीरत्न कां न जोडावें ॥
या लाभा करितां तों कुशलें सर्वस्व तुच्छ सोडावें ॥ २४ ॥
खळ-भृत्य-कथित कुमत श्रवण करुनि दुष्ट-मति सुरा-कुंभ ॥
न करुनि विचार कांहीं निज दूतातें असें ह्मणे शुंभ ॥ २५ ॥
सुग्रीवा शीघ्र करीं जेणें वश होय रत्नभूता तें ॥
सांगे मदांऽध जैसा वेताळ सुधादि-यत्नभूतातें ॥ २६ ॥
कासार असे समुचित तो तव-संगमसुरापगे लाहो ॥
ऐसें ह्मणावया त्या परमशिवे प्रति सुराप गेला हो ॥ २७ ॥
दूत ह्मणे देवि जसा जलनिधि-पानें प्रसिद्ध कुंभज या ॥
त्रैलोक्यांत तसा चि प्रख्यात असे करूनि शुंभ जया ॥ २८ ॥
जो अहताज्ञ सुरांत स्वजना बहु देतसे मह हताऽरी ॥
असुरां प्रताप ज्याचा व्यसनीं ह्मणउनि परां अहह तारी ॥ २९॥
दैत्येश्वर परमेश्वर माझ्या वदनें करूनि आपण तो ॥
श्रवण करावें त्वां तें देवि त्वदनुग्रहार्थ जें ह्मणतो ॥ ३० ॥

१ संग्रहीं. २ रत्नभुक्-वर-रत्नभोक्त-यांत श्रेष्ठ जो तूं त्या तुवां. ३ तलाव. ४ हे गंगे. ५ अहत-आज्ञ-अखंडित आज्ञा ज्याची असा (शुंभाचें विशेषण). ६ उत्सव. ७ शत्रूला. ८ खेदार्थी अव्यय. ९ त्वत्-अनुग्रह-अर्थ-तुज वर अनुग्रह करण्या करितां.

त्रैलोक्य सकळ माझें मजला झालें समस्त सुर वश तें ॥
यश ऐकिलें जगें जें विश्रुत गंधर्व-राज-सु-रव-शतें ॥ ३१ ॥
इंद्रादिदेवता मी सेवितसें सर्व-यज्ञ-भागांतें ॥
माझा प्रताप दुःसह अहितांतें गरुड जेविं नागांतें ॥ ३२ ॥
लोकत्रयांत रत्नें जीं जीं ऐरावतादि गज-रत्नें ॥
होतीं ज्यांचीं त्यांहीं आणुनि मज तीं समर्पिलीं यत्नें ॥३३॥
क्षीरधिमथनोद्भव जो नामें उच्चैःश्रवा यशें सजला ॥
हरि-वाहन हरि-रत्न प्रणत-सुरांहीं समर्पिला मजला ॥ ३४ ॥
जीं रत्नें देवांचीं गंधर्वांचीं तशीं च नागांचीं ॥
तीं झालीं प्राप्त मला व्हावीं च फळें जशीं स्व-यागांचीं॥३५॥
स्त्री-रत्न मानितों तुज लोकीं मी रत्न-मात्र सेवितसें ॥
ये मज कडे चि आले रत्नांऽतर निज-यशोऽर्थ देवि तसें॥३६॥
स्त्री-रत्न ह्मणुनि भज तूं मज करित्या शत्रु-हानि शुंभातें ॥
कीं गुरुपराक्रमा या मत्तुल्या मदनुजा निशुंभातें ॥ ३७ ॥
तूं मत्परिग्रहास्तव परमैश्वर्यासि पात्र होशील ॥
व्हायासि मत्परिग्रह तुज वरि च तुझें प्रसन्न हो शील ॥३८॥
दुर्जनदूतोक्त असें ऐके ऐकों नये कधीं परि तें ॥
गंभीर अंतरीं स्मित करुनि भगवती स्वयें वदे अरितें ॥३९॥
दूता किमपि न मिथ्या तूं वदलासि स्व-वृत्ति-हित साच ॥

---

१ इंद्राचें वाहन. २ घोड्यां मध्यें रत्न असा (उच्चैःश्रव्याचें विशेषण). ३ मत्-परिग्रह-माझी स्त्री झाल्यामुळें ४ स्वभाव. ५ दुर्जन-दूत-उक्त दुष्टदूताचें भाषण.

त्रैलोक्याचा अधिपति शुंभ जसा तो निशुंभहि तसाच ॥४०॥
तरि कां अवश्य न ह्मणशि ऐसें वदशील सांगतें परिस ॥
सोडूं नये प्रतिज्ञा धर्म नसे सत्य-भाषणा-परिस ॥ ४१ ॥
अल्पमतित्वें आपण हा पण दूता मनांत म्यां पहिला ॥
केला आहे अनृता भ्यावें तितुकें भिऊं नये अहिला ॥ ४२ ॥
जो मज जिंकील रणीं मम-गर्वातें करील जो दूर ॥
तो मज समबळ माझा भर्ता होइल जनांत जो शूर ॥ ४३ ॥
ऐसा मत्पण या स्तव करुनि रणीं गर्व-हानि शुंभानें ॥
किंवा शीघ्र धरावा जिंकुनि मज पाणि हा निशुंभानें ॥ ४४ ॥
दूत ह्मणे गर्विष्ठे न वद असें मज पुढें कसें वदसी ॥
शुंभ निशुंभ सुदुर्जय कंप-द पविपाणिलाहि कीं तदसी ॥४५॥
त्रिजगीं कोण पुरुष तो शुंभ-निशुंभा समोर राहेल ॥
पाहेल घूक रविला काय शश हरि-प्रहार साहेल ॥ ४६ ॥
अन्या दैत्यांहि पुढें सर्व-सुरांचेहि कांपती कार्य ॥
मग शुंभादिसमक्ष स्त्री जी न धरील कांप ती कायं ॥ ४७ ॥
जाशील एकली स्त्री तूं कैसी त्या समोर उत्साहें ॥
स्पष्ट तुझें तुज देइल जोडुनि अविचार शीलकुत्सा हें ॥ ४८ ॥
अभिमान मनीं धरिला तो द्याया दुःख-रौरवा जागे ॥
देवि न होउनि केशा- कर्षणनिर्धूतगौरवा जा गे ॥ ४९ ॥

---

१ एक. २ इंद्राला हि. ३ तत्-असि-त्यांचा खड्ग. ४ दिवांध-पक्षी (घुबड) ५ सिंहाचा मार. ६ देह. ७ प्रश्नार्थक अव्यय. ८ निंदा. ९ केश-आकर्षण-निर्धूत-गौरवा-केशांच्या ओढण्यानें गेलें गौरव (गुरुत्व) जीचें असी.

देवी दूतासि ह्मणे वदलासि जसें तसेंचि हें आहे ॥
शुंभ तसाचि निशुंभ प्रभुपणही न स्व-लंघना साहे ॥ ५० ॥
काय करूं मी केली न विचार करुनि अशी प्रतिज्ञा त्या ॥
जा सांग असें कृत-पण- रक्षाऽर्थ धरुनि असिप्रति ज्ञात्या ॥५१
भ्यावें स्व-पणापूर्वी म्यां आतां भिउनि काय गा होतें ॥
माझा निरोप सर्वहि सांग तया योग्य जें करो तो तें ॥५२॥

## अध्याय २.

प्रकुपित दूत सविस्तर शुंभासि शिवोक्त[1] सर्व आयकवी ॥
विघ्नित-काम-खळाचा वर्णील क्रोध-वेग काय कवी ॥ १ ॥
त्या दूतोक्तश्रवणें कोपें अत्यंत तापला खळ गा ॥
व्यसनांत आपणाला पाडी मद जेविं आपला खळगा ॥ २ ॥
द्यावें फुटकें तुंबी- फळ गंगा-लंघनाऽर्थ बाहूनीं[2] ॥
हें कार्य तसें सांगे मूढा असुराऽधिपास बाहूनीं[3] ॥ ३ ॥
हे धूम्रलोचना त्वां पानें मानेंहि नित्य जी तुष्टा ॥
स्व-चमू घेउनि सत्वर जावें जेथें असेल ती दुष्टा ॥ ४ ॥
केशांतें धरुनि बळें आकर्षुनि करुनि विव्हळा वीरें ॥
आणावी जाणावी आज्ञा निःसंशया तुवां धीरें ॥ ५ ॥
तीतें रक्षाया तरि तेथें कोणी उठेल जो दक्ष ॥

---

१ शिवा-उक्त-देवीचें भाषण. २ भुजांनीं ३ बोलावून.

मारावाचि असो पर तो सुर गंधर्वराज कीं यक्ष ॥ ६ ॥
साठ सहस्र असुर-बळ घेउनि लंघावयासि तो मलधी[1] ॥
पावे श्रीदुर्गेतें वेळेतें[2] खवळला जसा जलधी ॥ ७ ॥
जी व्यसन आश्रितांस न बाधों दे जेविं घन-घटा ऊन ॥
त्या भगवतीस तो खळ बळ-मत्त असें वदे दटाऊन ॥ ८ ॥
शुंभ-निशुंभापाशीं चाल तिळहि हित नसे दुरभिमानीं ॥
त्या प्रभुच्या आज्ञेतें सर्वस्व-हितावहा सुरभि मानीं ॥ ९ ॥
प्रभुची आज्ञा मोडिशि आवडली तुज नवीच कां चाल ॥
प्रभुवाग्वंशासि[3] ह्मणे नय कीं पाशीं पडोनि कांचाल ॥ १० ॥
तूं नीतिनें जरि न त्या मत्स्वामि समीप धरुनि मद येशी ॥
केशीं कवळुनि ओढुनि नेइन कीं कुजन पात्र न दयेशी ॥ ११ ॥
जगदंबा त्यासि ह्मणे दैत्येंद्रें धाडिलासि या काजा ॥
तूंचि बळी बळ-वेष्टित जरि नेसिल यत्न काय तरि माजा[4] ॥ १२ ॥
नेसिल बळेंचि मज कीं तूं बळवान् ज्ञात धर्म-नय शास्त्री ॥
कलह करुनि पुरुषाशीं तेजें साधी न शर्म[5] न यश स्त्री ॥ १३ ॥
तो समजे देवीनें रचिल्या विपुला निजोपहासासी[6] ॥
तीवरि धांवे व्याघ्री- वरि ओतुंतसा[7] सकोप हा सासी[8] ॥ १४ ॥
हुंकारेंचि तयातें सहसा परमेश्वरी करी भसित[9] ॥

---

१ मलिन बुद्धि ज्याची किंवा मळाचा ( पापाचा ) समुद्र. २ तीरातें. ३ वाक्-वंश-वाणीच्या विस्ताराला. ४ माझा. ५ सुख. ६ निज उपहास-आपल्या थट्टेला. ७ बोक्यासारिखा. ८ सखड्ग. ९ भस्म.

प्रकटी यश दरहिमकर- दुग्धाब्धितरंगहरहरीभसित ॥ १५ ॥
क्रोधें तेहि खवळले गर्वें कोठेंहि जे न पर मांती ॥
पर माती करि त्यांची तत्काळाचि सहमृगेंद्र परमा ती॥१६॥
त्या धूम्रलोचनाचा तत्सैन्याचाहि नाश कळला हो ॥
शुंभ ह्मणे ती दुष्टा या कर्माचें यथार्थ फळ लाहो ॥ १७ ॥
आज्ञा करी शिवेवरि जाया तो शुंभ दैत्य पुंडातें ॥
जेणें निवेदिली ती त्या चंडातें तयाहि मुंडातें ॥ १८ ॥
रे चंडमुंड हो जा सत्वर घेऊनि विपुळ-सैन्यातें ॥
आणा खाणा तन्मद- गद त्या धिक्कार करुनि दैन्यातें ॥ १९
यानंतर अंबेतें ओढूनि बळें धरूनियां वेणी ॥
किंवा बांधुनि आणा वृकचि तुह्मी असुर-वीर ती एणी ॥२०
अथवा गांढुनि समरीं असुरांहीं शस्त्र-शत-गणें अल्पा ॥
सिंह वधूनि करावी ती सर्वांहीं झटोनि हतकल्पा ॥ २१ ॥
मग करुनि कठिन निज-मन बंधन युवतीस बळकट करा हो
तुमचें असावध स्त्री ती धरिल्याही न पळ कटक राहो ॥ २२
कार्य-करा भृत्यांवरि पूर्ण प्रभुचा प्रसाद हें जाणा ॥
साधु असाधु करा परि बहु सत्वर मत्समीप ती आणा ॥२३

---

१ दर-हिमकर-दुग्ध-अब्धि-तरंग-हर-हरि-इभ सित-शंख, चंद्र, क्षीरसमुद्राची लहरी, महादेव आणि इंद्राचा ऐरावत यां सारिखें शुभ्र असें ( यशाचें विशेषण ). २ मावती. ३ परंतु. ४ तत् मद-गद-तिचा गर्वरूप रोग. ५ हरिणी. ६ मेल्यासारिखी.

# अध्याय ३.



ते चंड-मुंड तेथुनि गेले घेऊनि कटक चतुरंग ॥
ज्यांचे रजें मळविती दिगिभकटाहि न स्व-भट-कच तुरंग॥१॥
जें प्रिय वाहुनि चरणीं फळ जळ दळ एक सुमहि मागा तें ॥
ऐसें जी माय ह्मणे जीचा कवि-वृंद सु-महिमा गातें ॥ २ ॥
तीतें तुहिन-नगाच्या कांचन-शृंगीं सलील वसलीतें ॥
ते खळ देखति सिंहीं कांहींसें हास्य करित बसलीतें ॥ ३ ॥
पाहुनि सिद्धि धराया झाले दुर्गेसि बहुत पामर ते ॥
न च शकते जरि शतदा नियमें साधूनि बहु तपा मरते ॥४
कोपे त्यांवरि देवी तें जें शरदिंदुकान्तिचें सदन ॥
झालें कज्जलवर्ण क्रोधें तत्काल तें तिचें वदन ॥ ५ ॥
झालें ललाट तीचें सहसा क्रोधें करूनि जें कुटिल ॥
तेथुनि काळी प्रकटे वाटे काळादिकांसि ती कुटिल ॥ ६ ॥
ती खड्ग-पाश-हस्ता अत्युग्रा त्या सुराऽरि- कटकांत ॥
शिरली सशांत जैशी व्याघ्री श्येनीहि जेविं चटकांत ॥ ७॥
वीरांसह कवळ जसा हय रथहि तसाचि ती करी सगळा ॥

---

१ ज्या सैन्याचे तुरंग. २ दिक्-इभ-कट-दिग्गजांचीं गंडस्थळें हि. ३ आपल्या योद्ध्यांचे केश. ४ पुष्प हि. ५ हिमाचलाच्या. ६ शरत्-इंदु-कांति-शरदतुसंबंधी चंद्राच्या तेजाचें. ७ वांकडें. ८ तुडवील, ९ चिमण्यांत.

जीचा न चाविला जो त्याहि मुखें वाट दे करीस गळा ॥८॥
तीच्या दंशनांसि कठिण पर-शस्त्रांचे न रासि पापडसे ॥
तद्देहा अस्त्र जसें न ब्रह्मज्ञा नरासि पाप डसे ॥ ९ ॥
सर्वत्र पाविजेला क्षणमात्रें नाश चंड-सेनांहीं ॥
करिती परांसि चरणाहि काळीचे काळ-दंडसे नाहीं ॥ १० ॥
जे प्रबळां असुरांतें कालीचे चूर्ण करिति दंत कसे ॥
ते न ह्मणावे चंडें मुंडें अत्युग्र मूर्त अंतकसे ॥ ११ ॥
ज्यातें अवलंबुनि ज्या निज-शत्रु-बळासि न हरि खपवी तें ॥
खपवूनि काळिका त्या देईल न लाज न हरिख पवींतें ॥१२
चंडाच्या शस्त्रांचा न करि तिचें गरळ-कटु निकर कांहीं ॥
मुंडायुध-वृष्टिहि नग भग्न न केलाचि झटुनि कर कांहीं ॥१३॥
मुंडें सहस्रशः क्षय त्या कालीचा करावया वक्रें ॥
शक्रें ज्यां जोडावे कर ऐशीं सोडिलीं महाचक्रें ॥ १४ ॥
सुबहु दिवाकर-बिंबें जैशीं मेघोदरीं तशीं शिरलीं ॥
काली-मुखांत चक्रें जेविं अपक्वें महाशनीं जिरलीं ॥ १५ ॥
चक्रें गिळोनि काळी त्रिभुवन-भय-कारका महास्यातें ॥
पसरुनि करी धरुनियां सुर-रिपु-वध-सारकाम हास्यातें ॥ १६॥
जेणें हरिलीं होतीं अमर-नरांचीं किरीट मुंडांसीं ॥
काळी खवळुनि कवळुनि कटक भिडे सुरजयार्थ मुंडासीं ॥ १७ ॥

१ दंतांसि. २ सिंह. ३ हर्ष. ४ वज्रातें ५ समुदाय. ६ गारांनीं. ७ अपथ्यें. ८ अति खाणाराचे ठायीं. ९ मुकुट. १० गोटें.

काळीनें धरिला जों माशाया पर-तमासि असि-तरणी ॥
प्रसवे धवळ-यशा जरि आपण वर्णीकरूनि असित रणीं ॥ १८ ॥
धांवे वेगें परम- क्षुधितां घृष्टाखुवरि जसी व्याली ॥
त्या पुंडा मुंडाचें मस्तक खंडी महाऽसिनें काली ॥ १९ ॥
त्या चंड-मस्तकातें खंडी त्याच्या कचांसि कवळून ॥
खवळानि रणीं सुखवी विश्वास यशें अशेष धवळून ॥ २० ॥
त्याचें हत-शेष बळ न टिकलें कालीपुढें भयें पळ तें ॥
सर्व पळालें जैसें तिमिर दिनकरप्रभोदयें पळतें ॥ २१ ॥
जें चंड-मुंड-मस्तक- युग काली दे तिला उपायन तें ॥
केले पुरुषार्थाचे सफळचि ज्या सर्वही उपाय नतें ॥ २२ ॥
काली ह्मणे महापशु दिधले म्यां चंड मुंड तुज आधीं ॥
शुंभ निशुंभ शिवे तूं वधुनि रण-मखीं यश स्वयें साधीं ॥ २३ ॥
देवी ह्मणे मजकडे तूं घेउनि चंड मुंड आलीस ॥
यास्तव तुज चामुंडा हें दिधलें ख्यात नाम आलीसं ॥ २४ ॥

## अध्याय ४.



शुंभ क्रोधें खवळे श्रवण करुनि चंड-मुंड-वध-वार्ता ॥
आज्ञापी सैन्यातें तो व्हाया स्वास्त्रियांहि अधवार्ता ॥ १ ॥

---

१ खड्गरूप सूर्य. २ काळी. ३ घृष्ट-आखु दांडग्या उंदिरा वर. ४ सर्पीण. ५ शुभ्र करून. ६ पळभर. ७ दिनकर-प्रभा-उदय-सूर्यतेजाच्या उदयानें. ८ शिवेला. ९ नजराणा. १० सखीस. ११ पतिवियोगें करून पीडित.

जे कंबु-धौम्र-कालक दौर्हृद-मौर्यादि सर्व ते योध ॥
घेउनि शुंभ निघाला गेला देवीसमीप सक्रोध ॥ १ ॥
देवी पाहे आलें अतिभीषण दैत्य-सैन्य जें तूर्ण ॥
स्वधनुर्गुण-नादांहीं करि भू-गगनावकाश ती पूर्ण ॥ २ ॥
सिंहहि बहुताचि गर्जे कालीही गर्जना करी मोटी ॥
त्या नादातें परिसुनि असुरांच्या त्या वधीत ती कोटी ॥ ४ ॥
तैं विधि-हरि-हर-वासव- देहापासुनि निघोनि तद्रूपा ॥
शक्ति शिवाप्रति आल्या देवैंहितपराहितार्थ ज्या भूपा ॥ ५ ॥
त्या शक्तींसह येउनि ईशान-प्रभु असें शिवेसि वदे ॥
मत्प्रेमें शीघ्र असुर मारुनि विश्वासि तूं शिवे शिंव दे ॥ ६ ॥
तों त्या देवी-देहा- पासूनि निघोनि चंडिका शक्ती ॥
पावे परम-भयंकर मूर्ति शिवाशतनिनादिनी व्यक्ती ॥ ७ ॥
वात्या उन्मूलन या सर्वाऽमर-साधु-रिपु चमू-कदली ॥
प्रकटुनि ईशानातें मग ती अपराजिता असें वदली ॥ ८ ॥
भगवंता दूतत्व स्वीकारुनियां क्षणींच तूं आंगें ॥
सत्कीर्तिस्तव जा त्या शुंभनिशुंभाकडे असें सांगें ॥ ९ ॥
त्रैलोक्यातें पावो शक्र जयाचें तयासि ओपावें ॥
सेवोत अमर हविर्ते धर्में तुह्मांतें ह्मणोनि ओ पावें ॥ १० ॥
जरि आपण वांचावें ऐसें इच्छित असाल आजि तरी ॥
पाताळाशि तुह्मी जा साम करीं हित-करी न आंजितरी ॥ ११ ॥

---

१ देवांच्या हितार्थ आणि शत्रूंच्या अहितार्थ. २ कल्याण. ३ वावटळ. ४ युद्धरूपनौका

बळ-गर्वें रण-कामचि तरि म्यां केला असे पुढें कर या ॥
माझ्या देवोत शिवा तुमच्या मांसें करूनि ढेंकर यो ॥ १२ ॥
कथुनि असें पाठविला दूत-पणें शिव ह्मणोनि ती देवी ॥
शिवदूती भक्त सदा या सन्नामा सुधाधिका सेवी ॥ १३ ॥
कथिला त्या देवीचा तैसाचि निरोप तो तयां शर्वें ॥
गर्वें मान्य न केला दुष्टांहीं ज्यांत मंगळें सर्वें ॥ १४ ॥
शिव झाला दूत वृथा मरति ह्मणुनि बहु दयाळु कळवळला ॥
परि त्याच्या हित-बोधें दोघांतुनि एकही न खळ वळला ॥ १५
शुंभ शिवेवरि गेला स्व-भट पुढें करुनि सर्वही राजा ॥
वंदिलाचि कर जोडुनि सांडुनि काठिन्य-गर्व हीरा ज्या ॥ १६
विविधायुधवृष्टि[3] असुर सर्वहि कात्यायनीवरि करीती ॥
न तशा मेघांच्या त्या प्रळयींच्या साजती बरिक रीती ॥ १७
देवीचे दिनकर-कर- खर-तर शर पर-विमुक्त-शस्त्रांतें ॥
भस्म करिति तत्काळ ज्वाळ जसे धौत-सूक्ष्म-वस्त्रांतें ॥ १८ ॥
मारी ती ब्रह्माणी स्व-कमंडलु-वारिचे सटाके[4] शें[5] ॥
परिभविली न परें जशि करिच्या शुंडदंडेंहि हरिसटा[6] केशों ॥ १९
माहेश्वरी त्रिशूळें चक्रें दैत्यांसि वैष्णवी मारी ॥
तैशीच शक्तिनें ती देवी शिखि वाहनाहि कौमारी ॥ २० ॥
निज-चक्र-तुंड-दंष्ट्रें यांहीं मारी परांसि वाराही ॥

---

१ माझ्या शिवा. २ महादेवानें. ३ विविध-आयुधवृष्टि. ४ सडाके. ५ शंभर. ६ सिंहाच्या मानेवरचा केश. ७ मोरवाहन जिचें असी.

तैशीच नारसिंही बहु भी जीच्या नखांसि वारा ही ॥ २१॥
चंडांऽट्टहास करुनि क्षितिवरि पाडुनि अनेक शिवदूती ॥
भक्षी पर-भर हारि जी तिस साधु न भू मनें कशि वदू ती ॥ २२॥
यापरि मातृगणातें प्रकुपित पाहोनि पावलें दैन्य ॥
त्रासें पलायन करी शुंभाचें निहत-शेष जें सैन्य ॥ २३ ॥
तेव्हां होय महासुर परम कुपित रक्तबीज बा राया ॥
धांवे मातृगणातें अत्यद्भुत युद्ध करुनि माराया ॥ २४ ॥
घाली तो ऐंद्रीशीं गांठि करुनियां त्वरा गदापाणी ॥
त्या क्षोभद होय कुलिश जैसें आमज्वरा गदा पाणी ॥ २५॥
क्षत-रक्तबीज-देहा- पासुनि जितुका हि रक्त-बिंदु निघे ॥
त्याचा होय महासुर जो किमपि उणेपणें न निंदुनि घे ॥ २६
तत्तुल्याचा व्हाया रक्ताचा मायबाप थेंब गळे ॥
कीं चालती बकाच्या बक बगळ्याच्या हि बा पथें बगळे ॥
ऐसे शतशः क्षतज- प्रभव पुरुष रक्तबीज-सम राजा ॥
सांगों काय करिति त्या मातृगणाशीं असीम समरा ज्या २८
ऐंद्रीनें क्षत केलें शिर हाणुनि वज्र पुनरपि तयाचें ॥
तद्रक्तज पुरुष वरिति तच्छीलजसें चि सुनर पितयाचें ॥२९॥
त्या शोणित-बीजातें निज-चक्रें करुनि वैष्णवी ताडी ॥

---

१ वायु हि. २ भयंकर जें क्रोधानें हसणें तें. ३ अनेक दैत्य. ४ शत्रूंचा भार. ५ शिवदूती. ६ भूमि. ७ मारून उरलेलें. ८ वज्र. ९ पक्क न झालेल्या ज्वरा. १० रोगा. ११ तत्-शील-त्या रक्तबीजाचा स्वभाव.

ऐंद्री कौमारी ही शूलें माहेश्वरी उरीं फाडी ॥ ३० ॥
त्या शक्तीतें ताडी तो शोणितबीज ही गदा-घातें ॥
बहु मानवले सर्व हि सुर त्याच्या त्या महागदाघातें ॥ ३१ ॥
शक्तींनीं क्षत करितां सर्वांगीं उसळले क्षतज-बिंदु ॥
बहु कोटि पुरुष झाले सिंधु-तरंगीं जसे तरणि इंदु ॥ ३२ ॥
ते रक्तोद्भव पुरुष व्यापुनि करिती भयार्त विश्वास ॥
निश्वास उष्ण सोडिति देव जयाचा नये चि विश्वास ॥ ३३॥
भ्याले निर्जर पाहुनि कालीतें चंडिका स्वयें सांगे ॥
चामुंडे मुख पसरीं तूं खाद्य स्वादु सांडिशी कां गे ॥ ३४ ॥
माझ्या शस्त्राघातें अरि-रक्ताचा उडेल जो बिंदु ॥
तो तव-मुखीं पडावा गुरु-पर्वीं जेंवि राहुच्या इंदु ॥ ३५ ॥
जे रक्त-बिंदुपासुनि होतिल उत्पन्न पुरुष तव-तुंडीं ॥
ते नच उरतिल पडले शलभ जसे दीप्त-वन्हिच्या कुंडीं ॥ ३६ ॥
पी रक्तातें घटघट गटगट ते गीळ जेविं अंजीर ॥
नव-यश गाइल करिकुळ अवलंबुनि चरण जेविं मंजीर ॥ ३७ ॥
या युक्तिनेंचि होइल समरीं हा रक्तबीज नीरक्त ॥
सर्व हि तुझिया साऽमर चामरकर भक्त वीजनीं रक्त ॥ ३८ ॥
काली ह्मणे शिवे तुज किति हा लघुकाय न पर मेरु चला ॥

१ महा-अगद-आघात-महारोगरूप जो तो रक्तबीज त्याच्या नाशानें. २ समुद्राच्या लाटांत. ३ जगास. ४ भरंवसा. ५ देव. ६ टोळ. ७ पादभूषण, पैंजण. ८ रक्तहीन. ९ चंवरी हातामध्यें ज्यांच्या असे. १० वारण्या विषयीं.

विश्वास निदेश तुझा अमृताहुनि काय न परमेरु चला॥३९
त्या शोणितबीजातें निजशूलें चंडिका नृपा हाणी ॥
वाहे तद्देहांतुनि रक्त जसें टोंचितां गंदा पाणी ॥ ४० ॥
जिकडे शोणित वाहे तिकडे पसरूनि ती वदन देवी ॥
काळी कराल-वदना त्या शोणित-बीज शोणिता सेवी ॥४१
वदनीं हाती त्यांतें भावी बहु सुरस मानवे चावे ॥
शतकोटि तद्रदांनीं परं वृत्रासुरसमान वेचावे ॥ ४२ ॥
रक्तज कुतर्कसे ती विद्याशी ते नवे नवे दमुनी ॥
शुंभनिशुंभ हि मानी तिस केवळ मानवे न वेद मुनी ॥ ४३॥
शोणितबीज गदेनें तोडी परि चंडिकेसि अल्पाही ॥
पीडा न उग्र हि गदा- घात करी जेंवि हरिसं तल्पाही॥४४
देवी शूलें वज्रें खड्गें हाणी तसें चि ऋष्टीनें ॥
दृष्टीनें हि हत करी अरितें खीळूनि बाण-वृष्टीनें ॥ ४५॥
काळी तद्रक्ताचे व्हाया तद्रचित पाप थेंब हुत ॥
निज-मुख-कुंडीं करि जरि मळला होताहि कापथें बहुत॥४६
केला निरक्त ऐसा अति दारुण रक्तबीज तो खचला ॥
सुर मुनि ह्मणति नमुनि यश वर्णनि देवू शिवेसि तोखं चला ४७
तो मातृगण प्रमुदित झाला विजयें करूनि मग नाचे ॥
जयजयकारें भरिती सुर मुनि हृदेशं सर्व गगनाचे ॥ ४८ ॥

---

१ गळं इत्यादि रोगाला. २ तनू-रद-तिच्या दंतांनीं. ३ शत्रु. ४ गणी. ५ विष्णूस. ६ बिछानारूप शेष. ७ शस्त्रविशेषानें. ८ कुमार्गानें. ९ संतोष. १० अंतराळें.

# अध्याय ५.



शुंभ निशुंभ क्षोभे श्रवण करुनि रक्तबीजनाशातें ॥
खळ-बळ सर्वहि खवळे कीं वश होणार काळ-पाशातें ॥ १ ॥
वाटे देवीस करुनि कलहा खल हा निशुंभ करिल गट ॥
त्या मागूनि कराया दुर्गा-बळ-हानि शुंभ करि लगट ॥ २ ॥
करि शुंभनिशुंभांशीं ती शक्ति परा सुसंगर हितातें ॥
साधुनि घाया शक्ता त्यातें हि परा सु-संग-रहितातें ॥ ३ ॥
करिती जगदंबेवरि ते दारुण-बाण वृष्टि अहित रणीं ॥
सोडी देवी शर जे असुहर तापद जसेचि अहितरणीं ॥ ४ ॥
छेदुनि शर-जालातें घाया मद हरुनि कंप दोघांतें ॥
सर्वांगीं शर हाणी देवी त्या असुरसंपदोघांतें ॥ ५ ॥
देवीच्या सिंह शिरीं कोपें चाऊनि अधर अरवालें ॥
असुराधिपें निशुंभें धांवुनि केला प्रहार करवालें ॥ ६ ॥
देवी स्वमनांत ह्मणे शीघ्रचि हा निकर वाळविल यातें ॥
ने बाणें व्हाया यत्-तेजो-हानि करवाळ विलयातें ॥ ७ ॥
तो शक्ति पुन्हा टांकी भ्यावें समरांङगणीं जिला शक्रें ॥

१ श्रेष्ठा (शक्तिशब्दाचें विशेषण). २ सत्संगशून्यातें. ३ प्राण हरणारे. ४ संतापदायक. ५ सर्प आणि सूर्य. ६ असुर-संपत्-ओघ-दैत्यसंपत्तीचे प्रवाह, त्यानें, (शुंभनिशुंभांचं विशेषण). ७ हलका (असुराधिपें या शब्दाचें विशेषण). १२ तळवारीनें.

तत्काळ भगवतीनें केली तैशी हि ती द्विधा चक्रें ॥ ८ ॥
शूल निशुंभ क्षेपी तों ये जैसा मदांध तूर्ण करी॥
त्यासि जसा सिंहीचा देवीचा मुष्टिपात चूर्ण करी ॥ ९ ॥
टाकी निशुंभ योजुनि जे साधिल कार्य हो गदा तीतें ॥
तत्काळ चि भस्म करी निज-शूलें क्षोभ भोग-दांतीतें ॥१० ॥
न विचारी जड कीं जय साधिल देवी रणांत परशु कसा ॥
केला भग्न शिवेनें दिव्यशुकीनें क्षणांत परशुकसा ॥ ११ ॥
दुर्गेनें तो मूर्छित करितां चि करुनि पराभव निशुंभ ॥
युद्ध करी आपण ही जायासि मरुनि परांभवनिं शुंभ ॥ १२॥
ज्याचे दिव्यायुध-धर विश्वांत ख्यात आठ भुज गानीं ॥
ज्यासि दिली आकारें क्रौर्यें ही स्पष्ट पाठ भुजगानीं ॥ १३॥
दिव्य-रथावरि बैसुनि सर्वाऽसुर-राज शुंभ आला जो ॥
त्या पाहुनि शंख शिवा वाजवि त्यां कां न चंद्रमा लाजो ॥
चाप-गुण-ध्वनिहि करुनि बहु आद्या शक्ति कांपवी जगती॥
सर्वाऽसुर तेजोवध- कर घंटानादही करी मग ती ॥ १५ ॥
हरिनें हि नाद केले पर-भट-नादासि जे अनादरिते ॥
ज्यांहीं मदपूर्ण महा गज झाले तत्क्षणीं अनाद रिते ॥ १६॥
काली उडोनि गगनीं स्व-कर-तळांनीं महीतळा ताडी ॥
त्या नादें पहिले जे शंखादि निनाद ते उणे पाडी ॥ १७ ॥

---

१ दुखंड. २ हत्ती. ३ क्षोभ व भोग देणारी-तीतें ४ देवलोकीं-च्या शुकीनें. ५ मानवलोकींच्या शुकासारिखा. ६ परलोकीं. ७ शंखाला.

ती शिवदूती हि करी जी पण अत्युच्च साश्वसुरथोर ॥
तेव्हां केले असुर- त्रासें सोडूनि सर्व सुर थोर ॥ १८ ॥
अतिशयित-क्रोधातें त्या समयीं शुंभ दैत्य तो पावे ॥
चित्तीं ह्मणे शिवेचे घ्यावे कीं स्वाऽसु तीस ओपावे ॥१९॥
त्यासि ह्मणे जगदंबा असुराऽपसदा रहा रहा नीचा ॥
दिधला तुला वराया हस्तांत उदार हार हानीच्या ॥ २० ॥
तेव्हां जय जय ऐसें ह्मणती गगनस्थ अमर परमेला ॥
हाहि मरो शीघ्र जसा तो तुजशीं करुनि समर पर मेला ॥ २१॥
शुंभ ज्वाला-माला- कुलवदना शक्ति भीषणा धाडी ॥
करुनि निरास महोल्का- घातें परमेश्वरी तिला पाडी ॥ २२॥
राजा तेव्हां व्यापी शुंभाचा सिंहनाद विश्वास ॥
तेचि न भ्याले बहु दृढ ज्यांसि महा-शक्ति-पाद-विश्वास॥२३॥
निर्घात-निस्वनानें शुंभाचा सिंहनाद लोपविला ॥
जो पविलो हुंकारें भंगद तो दैत्यराज कोपविला ॥ २४ ॥
शुंभाच्या बाणांतें निज-बाणाच्या शिवा महानिकरें ॥
हानिकरें तीच्या ही छेदी असुरेंद्र शत्रु हा निकरें ॥ २५ ॥
मग जगदंबा मूर्छित पाडी शूलें तयासि विंधून ॥
देवीप्रताप गमला तिळहि न घटजोन तोहि सिंधून ॥ २६ ॥

---

१ स-अश्व-सु-रथ- उर. २ तुला वराया हानीच्या हातांत उदार हार दिला आहे. ३ शत्रु-महिष. ४ महाशक्तीच्या पायीं निश्चय ज्याचा ते. ५वज्राला. ६ घटज-ऊन-अगस्ती हून उणा. ७ सिंधु-ऊन-समुद्राहून उणा.

तों तो निशुंभ सुर-रिपु उठला सोडुनि असावधानपण ॥
करिता इतर शिवेच्या भत्यय येतां असा वधा न पंग ॥ २७ ॥
देवीतें काळीतें हरितें शर व्हावयासि यश हाणीं ॥
संपन्मदांधमति निज- परिणामनिरीक्षणीं नच शहाणी ॥ २८ ॥
होउनि अयुत-भुज असुर झांकी देवीस अयुत-चक्रांहीं ॥
भ्यावें ज्यांसि यम-वरुण- यक्षप-वाताऽर्क-वान्हि-शक्रांहीं ॥२९
सुर-मति सहसा मोहीं चक्र-समूहीं जशीच ती लोपे ॥
तेव्हां देवी बहुतचि समरीं दुर्गार्तिनाशिनी कोपे ॥ ३० ॥
छेदी त्या चक्रातें स्वशरांहीं त्याहि बाण-जाळांतें ॥
देवांतें स्वोत्कर्षे त्हष्ट करी तस दैत्य-पाळांतें ॥ ३१ ॥
कुपितनिशुंभ शिवेचें चूर्ण करायासि उर गदा हातें ॥
पडताळुनि धांवे तो जैसा धृतवैर उरग दाहांतें ॥ ३२ ॥
समरांत निशुंभा जी होउनि तदराति यम गदा पावे ॥
तीतें खड्गें खंडुनि देवीनें कोण न मग दापावे ॥ ३३ ॥
तरि मूढ शूळ घेउनि धांवे कीं जीस काळ घेरी ती ॥
माते तुमजे बाळाची माज्ञाहि होऊनि बाळ घेरी ती ॥ ३४ ॥
दुर्गा मनीं ह्मणे मम- शूळचि या शत्रुचें उर विदारू ॥
कीं हा अरातिजीवन दृढहि न दहनाहि जसा उरवि दारू ॥ ३५ ॥
शूळ धरुनि शुंभ-हृदय शूळचि विदारितां अगा राया ॥
पुरुष निघे त्या भग्ना त्हदया सोडुनि जसा अगारा या ॥ ३६ ॥

---

१ प्रतिज्ञा. २ संपत् मद-अंध-द्रव्यमदानें आंधळी बुद्धि ती. ३ संकटनाशिनी. ४ विषरूप सर्पातें ५ काष्ठ. ६ गृहा.

भग्ननिशुंभरहुद्गत सुमहाबळ पुरुष युद्ध-दृढ-निष्ठ ॥
श्रीमज्जगदंबेतें बाहिर निघतांचि तो ह्मणे तिष्ठ ॥ ३७ ॥
तों हांसुनि मस्तक हरि देवी न करूनि एक पळ उशिर ॥
दुर्गाऽसिर्पुढूनि अरि जरि अहिपुढुनिहि बाळ-भेक पळउ शिर ३८
ऐसा जगदंबेनें सुर-शत्रु निशुंभ हरुनि मद वधिला ॥
जो मत्त ह्मणत होता कोण करिल शस्त्र धरुनि मदवधिलां॥३९॥
जें सैन्य निशुंभाचें सुर दुःसह बहुत मातलें होतें ॥
कालीनें काळमुखीं बाळमुखीं तेविं घातलें हो तें ॥ ४० ॥
कांहीं शिवदूतीनें कांहीं सिंहें रणांत लोळविलें ॥
कांही त्या मातृगणें स्वर्गापति गौरवूनि बोळविलें ॥ ४१ ॥

---

## अध्याय. ६

ज्याच्या दृष्टिपुढें सुर- सेना समरांत परम दभ्रा त्या ॥
शुंभ विलोकी निहता प्राणसम-ध्वस्तपरमद-भ्रात्या ॥ १ ॥
त्याहि विलोकी ध्वस्ता विध्वस्ताऽशेष-सुर-सभा सेना ॥
ज्याच्या नव नव सुयशा हूनि मना अमृत सुरस भासेना ॥ २॥
बंधु-वधें सैन्य-वधें शुंभ क्षोभे लयाऽग्निशीं तोले ॥
त्या देवीस कडकडुनि जड कटु निपटुचि रणीं असें बोले ॥ ३ ॥
साऽहंकारे दुष्टे दुर्गे शौर्यें धरूं नको गर्व ॥

---

१ भग्न-निशुंभ-हृत्-उद्गत-भेद पावटेल्या निशुंभाच्या वक्षस्थळापासून निघाला. २ उभी रहा. ३ हरण करी. ४ दुर्गेच्या खड्गापुढूनि. ५ मत्-अवधि-माझ्या नाशाला. ६ तुच्छा.

अन्याचें बळ आश्रय करुनि करिशि युद्ध हें वृथा सर्व ॥४॥
श्रीदुर्गा त्यासि ह्मणे रे दुष्टा ऐक साधु-धी-रहिता ॥
मी एकलीच आहें या विश्वा माजि साधु-धीर-हिता ॥ ५ ॥
ज्या ब्रह्माणी-प्रमुखा माझ्याचि विभूति जाण पापा हें ॥
मजमाजि समस्ताही ह्या करितात प्रवेश हा पाहें ॥ ६ ॥
हें ह्मणतां ब्रह्माणी- प्रमुखा त्या देवता स्व-गेहांत ॥
सर्वा प्रवेशल्या त्या दुर्गेच्या तत्क्षणीं च देहांत ॥ ७ ॥
देवीच्या वृंदातें निरूपिजे जेविं भूमि कुंभातें ॥
नेऊनि विलायासि ह्मणे सर्वाद्या सर्वभूति शुंभातें ॥ ८ ॥
होतीं प्रगट त्रिजगीं साधु-हित करुनि असाधु वध माजीं ॥
त्यां आवरिलीं रूपें तीं सुबहुमतें श्रुतींस अधमा जीं ॥ ९ ॥
मी एकलीच आतां उरलें आहें रणांत न चपाप ॥
हूं हाण बाण जाण स्त्री न मज तुला घडेल नच पाप॥१०॥
ऐसें बोलुनि देवी आरंभी भव्य-समर-सत्रास ॥
ज्यातें पाहुनि झाले सर्व-महेंद्रादि अमर सत्रास ॥ ११ ॥
शस्त्रास्त्रें देवीनें जीं त्या समरांत सोडिलीं होतीं ॥
शुंभें प्रतिशस्त्रास्त्रें योजुनि तत्काळ मोडिलीं होतीं ॥ १२ ॥
देवीही शुंभाच्या खंडी लीलेंकरूनि शस्त्रांतें ॥
अस्त्रांतेंही उडवी वात जसा शुष्क-सूक्ष्म-वस्त्रांतें ॥ १३ ॥
परमेश्वरी करी जें मी वर्णू आज काय बा हूं[4] तें ॥

१ समूहातें. २ माझीं. ३ त्रासयुक्त. ४ हुंकार.

परशस्त्रास्त्रांतें चि न दे बहुत शिव्या हि लाज वाहू तें ॥१४

कोंडी पळभरि शुंभ श्रीमज्जगदीश्वरीस शरभवनीं ॥
पर-शर झाले दुर्गा- शर-वृंदीं जेंवि सिंह शरभ-वनीं ॥ १५॥
ह्मणति सुरी झगटतसे शिरिं घाया वामपाद परि मेला ॥
परमेला हा जिंकिल तरि पुरवुनि काम पादप रमेला ॥ १६॥
स्वाच्छादक शर-पटलें छेदुनि खंडूनि शुंभ चापातें ॥
जेंवि परा विद्या जैनि मृति-हेत्वऽज्ञान-रूप पापातें ॥ १७॥
मग शुंभ शक्तितें धरि चक्रें खंडी तिला हि परमा तीं ॥
शतचंद्र चर्म असि घे त्याची हि करावया सि परि मातीं॥१८
चुरिलें शिवा-शरांनीं त्या असिसह चर्म रवि-कराऽमळ तें ॥
कीं अविनीताचें यश करितां हि सहाय पविकरा मळतें॥१९॥
केला जगदाद्येनें लीलेनें संगरीं विरथ बकेला ॥
बहुधा बहुधाष्ट्यें घे मुद्गर न रहावया शिर थबकेला ॥ २० ॥
येतां धांवत खंडी बाणांहीं मुद्गरा शिवा राया ॥
तरि येचि शालि-राशि- प्रति जैसा मुद्गराशि वाराया ॥२१॥
न परभृतीसि साहे माशीशी स्पर्शतां जसा कुष्ठी ॥
जगदंबेच्या हृदयीं हाणी धावोनि दुष्ट तो मुष्टी ॥ २२ ॥

---

१ श्रीमत्-जगत्-ईश्वरी-शोभायमान असी सर्व जगाची धनीन (देवी) तिला. २ बाणगृहीं. ३ देवांगना. ४ परंतु. ५ जन्ममरणाला कारण जें अज्ञानरूप पाप त्यातें. ६ ढाल. ७ शत्रु ८ सूर्यकिरणासारिखें स्वच्छ. ९ वज्रधरणाऱ्या इंद्राला. १० बडबडला. ११ उभा राहिला. १२ मुगांचा समुदाय.

देवी क्षितिवरि धडडड पाडी हाणुनि उरीं अरीस तळें[1] ॥
होइल सुबहुमत कसें आत्मगुणें सागरापरीस तळें ॥ २३ ॥
सहसा उडुनि शिवेतें घेउनि गगनांत जाय मग नीच ॥
जरिहि निराधारा ती करि अरिशीं बाहुयुद्ध गगनींच ॥२४॥
तें प्रथम सिद्ध-मुनि-जन- विस्मय-कारक नियुद्ध[2] बहुरुचिर ॥
झालें त्या श्रीदुर्गा- दैत्याशीं खांगणीं[3] अतुल सुचिर ॥ २५॥
सुचिर नियुद्ध व्योमीं करुनि धरुनि अरिहरिसहगजातें ॥
सुखव्हाया फिरवि अधिक जरि सकळांपरिसहरिसहगजातें २६
फिरवुनि भरभर गरगर अंबा लंबाऽलि-[4] संनिभ-सुकेशी ॥
ती आपटी महिवरी शुंभ-तनू जीवना प्रति सुकेशी ॥ २७ ॥
उठुनि वळुनि मुष्टि सबळ कुंदुकसा[5] तो पुन्हा उसळला जो ॥
त्या पाहुनि नच लवणें[6] स्ववृत्त म्हणतां पुन्हा मुसळ लाजो ॥
नीच निमट त्या हाणुनि मुष्टि विदाळुनि वक्ष माराया ॥
तेव्हां सदयाहि करी जगदंबा लेश न क्षमा राया ॥ २८ ॥
शुंभातें जयमूळें शूळें हृदयांत चंडिका ताडी ॥
शत्रु-शतशमनशीळा लीलालेशेंचि भूतळीं पाडी ॥ ३० ॥
झाला असतां तो खळ सुर-मद-नग-भित्[7] नव क्षम रणातें ॥
पावे शूलाघातें होतां मग भिन्न-वक्ष मरणातें ॥ ३१ ॥

---

१ हस्ततलानें. २ बाहुयुद्ध. ३ ख-अंगण-आकाशरूप आंगण्यांत. ४ लांब आणि भ्रमरसदृश काळे जिचे केश असी. ५ चेंडू सारिखा. ६ नम्र होणें. ७ देवांचा गर्वरूपपर्वत फोडणारा.

पडतां तेणें सकळा भू सद्वीपा ससागरा सनगा ॥
कांपविली एक न त्या देवीचें मात्र कांपलें मन गा ॥ ३२ ॥
मग लागल्या कराया राया मार्गें चि यान सागरगा ॥
तो जेविं ताप-मोह-मद होय न तेविं मानसा गरें गा ॥ ३३
विश्व प्रसन्न झालें होय जसें भास्करोदयीं कमल ॥
उत्पात-मेघ शमले सर्व व्योम प्रकाशलें अमल ॥ ३४ ॥
झाले प्रहर्ष-निर्भर, मानस सुर जे महाधिनें गळित ॥
गंधर्वांहीं केलें गान शिवासद्यशोमृतें ललित ॥ ३५ ॥
वाजविलीं बहु वाद्यें सुपटु-शत-सहस्र-वादकांहीं हो ॥
तद्रव हित कर्णांला न च रुचला इतर वाद कांहीं हो ॥३६॥
अतिमुदित अप्सरांचे गण तेव्हां नाचले शत ज्ञाते ॥
निज मान धरूं देती न च त्यांचे नाच लेश तज्ज्ञा ते ॥३७॥
मंद सुगंध सुशीतळ वायु तदा लागले वहायास ॥
सुप्रभ होय दिवाकर त्यातें पद्म हि सुखें पहायास ॥ ३८ ॥
पेटत नव्हते पूर्वीं जे अग्नि सुखें चि पेटले हो ते ॥
होते खिन्न मुदित मग होउनि बहु त्यांसि भेटले होते ॥३९॥
कादंबिनी शिवेतें जो शतमखमुख तयाहि लेखांतें ॥
चातक मयूर ऐसें तच्चरितहि अमृतवर्ष लेखा तें ॥ ४० ॥

समाप्त.

---

१ पर्वता सहित. २ समुद्रांत गमन करणाऱ्या नद्या. ३ विष. ४ यज्ञकर्ते. ५ मेघमाला. ६ देवांतें.